केंद्र शासनाच्या सागरमाला कार्यक्रमांतर्गत बंदराद्वारे औद्योगिक विकास (Port Led Industrianation ) करण्यासाठी गृह (बंदरे) विभाग आणि उद्योग विभागाची समन्वय समिती <u>स्थापन करण्याबाबत.......</u>

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- धोरण -१०१५/प्र.क्र.२६५(भाग-५)/बंदरे-१,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०३ ऑगस्ट, २०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्र शासनाच्या सागरमाला प्रकल्पांतर्गत देशाच्या किनापट्टीचा वापर आर्थिक विकासाकरीता करुन घेण्यासाठी बंदर विषयक पायाभूत सुविधांचा विकास करण्यात येणार आहे. अस्तित्वातील बंदरांचे आधुनिकीकरण व जागतिक दर्जाच्या नविन बंदराच्या विकासासाठीचे प्रकल्प समाविष्ट करण्यात येणार आहेत. माल वाहतूकीच्या दृष्टीने किनारपट्टीवरील बंदरांना देशातील अंतर्गत ठिकाणांशी जोडण्याकरीता रस्ते व रेल्वे जोडणी प्रकल्पांचाही अंतर्भाव सागरमालामध्ये आहे. याशिवाय किनारी व देशांतर्गत जलवाहतूक मार्गांचाही विकास करण्यात येणार आहे. सागरमाला कार्यक्रमाचे मुख्य ४ भाग आहेत. (१) बंदरांचे आधुनिकीकरण (Port Modernization), (२) बंदर रेल्वे व रस्ते जोडणी प्रकल्प (Port Railway & Road connectivity), (३) बंदराद्वारे औद्योगिक विकास (Port Led Industrianation ) (४) सामाजिक विकास व कौशल्य विकास (Social development and skill development) याअंतर्गत CEZ प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी व समन्वयासाठी दिनांक २०.०६.२०१७ रोजी अपर मुख्य सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या बैठकीत बंदराद्वारे औद्योगिक विकास (Port Led Industrianation) करण्यासाठी उद्योग विभाग आणि गृह विभागाची समन्वय समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार सदर समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सागरमाला प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी आणि समन्वयासाठी खालीलप्रमाणे गृह विभाग व उद्योग विभागाची समन्वय समिती स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| (१) | गृह (बंदरे) विभागाचे सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी | - अध्यक्ष |
| (२) | उप सचिव (उद्योग-८), उद्योग, उर्जा व कामगार विभाग | - सदस्य |
| (३) | सह सचिव, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, | - सदस्य |
| (४) | अतिरिक्त संचालक उद्योग, उद्योग संचालनालय | - सदस्य |
| (५) | अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय | - सदस्य |
| (६) | नौवहन सल्लागार, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड | - सदस्य |

०२. हा शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २० /उद्योग-८, दिनांक १०.०७.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१२४६५४२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shaila Ravindra Mithbavkar

Digitally signed by Shaila Ravindra Mithbavkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bb03c6d206c79568018ba9511400e3bd24537b79e0985b2d7a66c816ab002f9, cn=Shaila Ravindra Mithbavkar
Date: 2017.08.08 11:41:40 +05'30'

**( शैला मिठबावकर )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (बंदरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, पोत परिवहन मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली-११०००१
६) सचिव,मिनिस्ट्री ऑफ शिपींग (सागरमाला कक्ष), भारत सरकार, नवी दिल्ली-११०००१
७) अपर मुख्य सचिव, (उद्योग), उद्योग ,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (बंदरे व परिवहन), गृह विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
११) निवड नस्ती (कार्यासन बंदरे-१)